**अलिबाग नगरपरिषद, जि.रायगड क्षेत्रातील नगरपरिषदेच्या मालकीची जागा श्रीबाग सहकारी मध्यवर्ती ग्राहक मंडळ लि.या संस्थेला भाडेपट्टा कराराने दिली असून सदर करारास ३० वर्षाकरीता मुदतवाढ देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- अनप-२०२३/प्र.क्र.०६/नवि-१९**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २४ एप्रिल, २०२३

वाचा :-

(१) जिल्हाधिकारी,रायगड यांचे पत्र क्र.नपाप्र/कार्या-१/भाडेपट्टा/मुदतवाढ/अलिबाग नप/श्रीबाग/२०२२, दिनांक २१ नोव्हेंबर, २०२२.

(२) मुख्याधिकारी, अलिबाग नगरपरिषद यांचे पत्र क्र.जा.क्र.२६३२,दि.०७ नोव्हेंबर, २०२२.

(३) अलिबाग नगरपरिषद सर्वसाधारण सभा ठराव क्र.९३२, दिनांक ६ ऑक्टोंबर, २०१६.

(४) अलिबाग नगरपरिषद विशेष सभा ठराव क्र.२५८, दिनांक ०९ जानेवारी, २०१८.

(५) मुख्याधिकारी, अलिबाग नगरपरिषद यांचे पत्र क्र.जा.क्र. ५५९, दिनांक ०३ मार्च, २०२३.

प्रस्तावना :-

अलिबाग नगरपरिषदेच्या हद्दीतील नगरपरिषदेच्या मालकीची सि.स.नं.१३२४ ही जागा नगरपरिषदेच्या विकास आराखडयात वाणिज्य कारणाकरीता राखीव असल्याने, सदरील जागा भुईभाडयाने देण्याकरीता अधिनियमातील तरतूदीनुसार वृत्तपत्रात जाहिर निविदा प्रसिध्द करुन निविदा प्रक्रियेअंती श्रीबाग सहकारी मध्यवर्ती ग्राहक मंडळ लि. अलिबाग या संस्थेला महाराष्ट्र नगरपरिषदा/नगरपंचायती व औद्यौगिकनगरी अधिनियम, १९६५ चे कलम ९२ मधील तरतूदीनुसार दि.१०/०६/२०१५ पासून दि.०९/०६/२०२४ पर्यंत (प्रत्येक ३ वर्षाला मुदतीचे नवीकरण करुन) नगरपरिषदेस असलेल्या अधिकारानुसार ९ वर्षाच्या कालावधीकरीता भाडेपट्टयाने देण्यात आली. सदर जागा सदरहू संस्थेस ३० वर्षे मुदतीकरीता भाडेपट्टयाने देण्याबाबत नगरपरिषदेच्या सर्वसाधारण सभा ठराव क्र.९३२, दि.०६/१०/२०१६ व विशेष सभा ठराव क्र.२५८ दि.०९/०१/२०१८ अन्वये मान्यता देण्यात आली असून त्यानुसार सदर भाडेकरारास दि.०९/०६/२०२४ पासून पुढे ३० वर्षे इतक्या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव मुख्याधिकारी, अलिबाग नगरपरिषद यांनी जिल्हाधिकारी, रायगड यांना सादर केला असता शासन अधिसूचना दि.२५/०३/२०११ मधील तरतूदीनुसार जिल्हाधिकारी, रायगड यांनी दि.०९/०६/२०२४ पासून पुढे ३० वर्षाच्या कालावधीकरीता भाडेपट्टयास मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

शासन अधिसूचना दि.२५/०३/२०११ मधील तरतूदी, नगरपरिषदेने दि.०६/१०/२०१६ व दि.०९/०१/२०१८ रोजी पारित केलेले ठराव, तसेच जिल्हाधिकारी, रायगड यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव व शिफारस विचारात घेऊन सदर प्रकरणी नगरपरिषदेने केलेल्या भाडेपट्टयास ३० वर्षे इतक्या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अलिबाग नगरपरिषदेच्या हद्दीतील नगरपरिषदेच्या मालकीची सि.स.नं.१३२४ ही जागा श्रीबाग सहकारी मध्यवर्ती ग्राहक मंडळ लि. अलिबाग या संस्थेला दि.१०/०६/२०१५ पासून दि.०९/०६/२०२४ पर्यंत ( प्रत्येक ३ वर्षाला मुदतीचे नवीकरण करुन) नगरपरिषदेस असलेल्या अधिकारानुसार विहित कार्यपध्दती राबवून भाडेपट्टयाने दिली आहे. अधिनियमातील तरतूदीस अनुसरुन जिल्हाधिकारी,रायगड यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे सदर भाडेपट्टयास दि.१०/०६/२०२४ पासून पुढील ३० वर्षाच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. याअनुषंगाने भाडेपट्टा करारासंदर्भातील प्रचलित तरतूदीनुसार कार्यवाही करावी. तसेच भाडेपट्टाधारकासमवेत यापूर्वी सन २०१५ ते २०२४ या कालावधीत मुदतवाढ देतांना करण्यात आलेल्या करारनाम्यातील अटी व शर्ती कायम राहतील. त्याचप्रमाणे नगरपरिषदेस आवश्यक वाटतील त्या अतिरीक्त अटी व शर्ती अंतर्भूत करुन भाडेपट्टा धारकासमवेत करारनामा करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४२४१४०६४०९२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RASHMIKANT PUNDLIKRAO INGOLE

Digitally signed by RASHMIKANT PUNDLIKRAO INGOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=58f272615d694188999d7059c35044b641a6f79b7f11b072357a034f1945b5bf, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=790D7A8A18A9128F2444E4F50CEC8C48E1E5B4AC49A5B5B6D6596149B3010E5B, cn=RASHMIKANT PUNDLIKRAO INGOLE
Date: 2023.04.24 14:12:25 +05'30'

**( रश्मिकांत इंगोले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
३. जिल्हाधिकारी, रायगड.
४. मुख्याधिकारी, अलिबाग नगरपरिषद, जि.रायगड.
५. सहायक संचालक, नगररचना (नगररचना आणि मुल्य निर्धारण विभाग), जि.रायगड.
६. निवड नस्ती (नवि-१९).